न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या आस्थापनेवरील गट-अ व गट-ब संवर्गातील राजपत्रित अधिकाऱ्यांचे सन २०१५-१६ पासून गोपनीय अहवाल प्रतिवेदित /पुनर्विलोकित/संस्करण करण्यासाठी सक्षम प्राधिकारी घोषित करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन शुध्दीपत्रक क्र.एफएसएल-०४१६/प्र.क्र.६४३/पोल-४,**
**गृह विभाग,मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.**
**दिनांक :- २२ नोव्हेंबर, २०१६.**

**संदर्भ** :- शासन निर्णय क्र.एफएसएल-०४१६/प्र.क्र.६४३/पोल-४, दिनांक १९ नोव्हेंबर, २०१६.

**शासन शुध्दीपत्रक :-**

दिनांक १९.११.२०१६ च्या शासन निर्णयामधील महासंचालक (न्यायिक व तांत्रिक) यांचे अधिनस्त न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या आस्थापनेवरील गट-अ व गट-ब संवर्गातील राजपत्रित अधिकाऱ्यांचे सन २०१६-१७ पासून गोपनीय अहवाल प्रतिवेदित/ पुनर्विलोकित/संस्करण करण्यासाठी खालील प्रमाणे सक्षम प्राधिकारी घोषित करण्यात आले आहेत. त्यामधील खालील नमूद केलेल्या तक्त्यामधील अ.क्र.७, १४ व १५ मधील मजकूर नमुद केला आहे.

| अ.क्र | गट व पदनाम | गोपनीय अहवाल प्रतिवेदित करण्यास सक्षम असलेले प्राधिकारी | गोपनीय अहवाल पुनर्विलोकित करण्यास सक्षम असलेले प्राधिकारी | संस्करण अधिकारी |
|---|---|---|---|---|
| ७ | सहायक संचालक | सहसंचालक | संचालक | उपसचिव (पोल-४), गृह विभाग |
| १४ | प्रशासकीय अधिकारी | सहसंचालक | | संचालक |
| १५ | प्रतिनियुक्तीने अन्य प्रयोगशाळेत/ विभागात कार्यरत असणारे गट-अ मधील अधिकारी | | | |

**सदर मजकूराऐवजी तक्त्यातील अ.क्र.७,१४ व १५ मध्ये खालीलप्रमाणे मजकूर वाचावे.**

| अ.क्र | गट व पदनाम | गोपनीय अहवाल प्रतिवेदित करण्यास सक्षम असलेले प्राधिकारी | गोपनीय अहवाल पुनर्विलोकित करण्यास सक्षम असलेले प्राधिकारी | संस्करण अधिकारी |
|---|---|---|---|---|
| ७ | सहायक संचालक | सहसंचालक | संचालक | उपसचिव (पोल-४), गृह विभाग |
| १४ | प्रशासकीय अधिकारी | उप संचालक | सह संचालक | संचालक |

| | | | |
|---|---|---|---|
| १५ | प्रतिनियुक्तीने अन्य प्रयोगशाळेत/ विभागात कार्यरत असणारे गट अ मधील अधिकारी | प्रतिनियुक्तीने अन्य विभागात/कार्यरत असणा:या गट अ व गट ब मधील अधिकाऱ्यांबाबत प्रतिनियुक्तीच्या विभागाकरिता संबंधित प्रतिवेदन आणि पुनर्विलोकन अधिकाऱ्यांकडून गोपनीय अहवाल लिहिण्याबाबतची विहित कार्यपध्दती अवलंबिण्यात यावी. | उपसचिव (पोल-४), गृह विभाग |
| १६ | प्रतिनियुक्तीने अन्य प्रयोगशाळेत/ विभागात कार्यरत असणारे गट ब मधील अधिकारी | | संचालक |

२. हे शासन शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०१६११२३१२२७५३५८२९ असा आहे. हे शुध्दीपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

Somnath V Potare

Digitally signed by Somnath V Potare
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=4d677dcd1bc3bed55a48ddbdaad925a6651c5d43a12d84cf305d3ff791ea7f16, cn=Somnath V Potare
Date: 2016.11.23 13:16:31 +05'30'

**(सोमनाथ पोटरे)**
अवर सचिव, गृह विभाग

**प्रति,**

१) महासंचालक (न्यायिक व तांत्रिक), न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) संचालक, न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३) अपर मुख्य सचिव (गृह) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) प्रधान सचिव (विशेष) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
५) सामान्य प्रशासन विभाग (कार्यासन-१३), मंत्रालय, मुंबई.
६) सर्व उपसंचालक,प्रादेशिक न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७) निवडनस्ती/गृह विभाग (पोल-४).